**कोषागारातून रोख देय अनुदान**
केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे अनुसूचित जाती घटकासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत...
**(लेखाशीर्ष २२१५ ९८२६)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-१२१५/प्र.क्र.८०/पापु-१६
७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक रोड, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २० ऑगस्ट, २०१५

वाचा

१. **शासन परिपत्रक क्रमांकः स्वभामि-२०१४/प्र.क्र.२७/पापु-०८, दि.७ नोव्हेंबर, २०१४.**
२. **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५.**
३. **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१५/प्र.क्र.१११/अर्थ-३, दि.३० जून, २०१५.**
४. **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्रशा.५, दि.२४ जुलै, २०१५.**
५. **केंद्र शासनाचे मंजूरी आदेश: दि.२२ जून, २०१५.**

प्रस्तावना

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या (पूर्वीचे निर्मल भारत अभियान) केंद्र हिश्श्यासाठी अनुसूचित जाती घटकाखाली २२१५ ९८२६ या लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ मध्ये रू.४६२७.९३ लक्ष (शेहेचाळीस कोटी, सत्तावीस लक्ष, त्र्याण्णव हजार फक्त) एवढा निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करून दिलेला आहे. सदर उपलब्ध निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय**

स्वच्छ भारत मिशनसाठी केंद्र हिश्श्याच्या अनुदानांतर्गत जिल्हा परिषदांना अनुसूचित जाती घटकांतर्गत स्वच्छता कार्यक्रम राबविण्यासाठी निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पीत रकमेपैकी रू.४६२७.९३ लक्ष (शेहेचाळीस कोटी, सत्तावीस लक्ष, त्र्याण्णव हजार

फक्त) इतके अनुदान संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे रोख स्वरूपात मुक्त करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान ज्या करणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच करणासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित जिल्हा परिषदा/संस्था यांनी या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ) संबंधित जिल्हा परिषदेने/संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

इ) अट क्र.२-अ आणि २-आ यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

ई) सदर रक्कम केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/ आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

उ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहित नमून्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील पापु-०४, पापु-१६ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

ऊ) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी निधी वितरण, खर्च याबाबतची नोंद केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर (IMIS) घेण्याची दक्षता घ्यावी.

ऋ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/ प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.१११/ अर्थ-३, दि.३० जून, २०१५ व शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१५/प्र.क्र.३४/ कोषा.प्रशा.५, दि.२४ जुलै, २०१५ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक त्या बाबींची पुर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरित सादर करावीत.

ऌ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

३. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, ०२ ग्रामसफाई कार्यक्रम, (०२) (०९) निर्मल भारत अभियान केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत शौचालय बांधणे (अनुसूचित जाती) (केंद्र हिस्सा) (२२१५ ९८२६)" ३१ सहायक अनुदाने या लेखाशीर्षाखाली घालावा.

४. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२२६/विघयो, दि.२४.७.२०१५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेने व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५ व शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.१११/अर्थ-३, दि.३० जून, २०१५ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११४०८३६९५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Dattatray Salve

Digitally signed by Ashok Dattatray Salve
DN: CN = Ashok Dattatray Salve, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.08.20 16:14:53 +05'30'

**(अ.द.साळवे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता)
३. विभागीय आयुक्त, सर्व.
४. उपायुक्त विकास, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
५. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर, नवी मुंबई.
१०. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा.व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
११. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१२. उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जिल्हा परिषद, सर्व.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.

१४.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, (विघयो) मंत्रालय, मुंबई.
१५.वित्त विभाग, (व्यय-३) मंत्रालय, मुंबई.
१६.कार्यासन क्र.पापु-०४, पापु-०८ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.निवड नस्ती, कार्यासन पापु-१६.

# विवरणपत्र

शासन निर्णय क्र.स्वभामि-१२१५/प्र.क्र.८०/पापु-१६, दि.२० ऑगस्ट, २०१५ सोबतचे सहपत्र.

(रू.लाखात)

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | दि.२० ऑगस्ट, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेली रक्कम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | ठाणे | २९४.०० |
| २ | रायगड | ८.०० |
| ३ | रत्नागिरी | १०८.०० |
| ४ | सिंधुदूर्ग | ४२.९३ |
| ५ | पालघर | १०५.०० |
| ६ | नाशिक | १०३.८१ |
| ७ | धुळे | ८०.०० |
| ८ | नंदूरबार | ११.२१ |
| ९ | जळगाव | ४५.०० |
| १० | अहमदनगर | २७७.२० |
| ११ | पुणे | ९.०१ |
| १२ | सातारा | ८६.१० |
| १३ | सांगली | १०८.०० |
| १४ | सोलापूर | ३३५.६४ |
| १५ | कोल्हापूर | ४४१.०० |
| १६ | औरंगाबाद | १०.५० |
| १७ | जालना | २९४.०० |
| १८ | परभणी | १०८.०० |
| १९ | हिंगोली | ६.३० |
| २० | बीड | ९८.०० |
| २१ | नांदेड | ६३०.०० |
| २२ | उस्मानाबाद | १०८.०० |
| २३ | लातूर | ९८.०० |
| २४ | अमरावती | ६३.०० |
| २५ | अकोला | १०८.०० |
| २६ | वाशिम | १०८.०० |
| २७ | बुलढाणा | ९८.०० |
| २८ | यवतमाळ | ९६.६० |
| २९ | नागपूर | १०८.०० |
| ३० | वर्धा | ९८.०० |

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | दि.२० ऑगस्ट, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेली रक्कम |
|---|---|---|
| ३१ | भंडारा | ८०.०० |
| ३२ | गोंदिया | ८०.०० |
| ३३ | चंद्रपूर | ३०७.१३ |
| ३४ | गडचिरोली | ७३.५० |
| **एकूण** | | **४६२७.९३** |
| **अक्षरी रूपये** | | **शेहेचाळीस कोटी, सत्तावीस लक्ष, त्र्याण्णव हजार फक्त** |

Ashok Dattatray Salve

Digitally signed by Ashok Dattatray Salve
DN: CN = Ashok Dattatray Salve, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.08.20 16:15:17 +05'30'

(अ.द.साळवे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन